**कौटुंबिक हिंसाचारापासून महिलांचे संरक्षण अधिनियम, २००५ अंतर्गत संरक्षण अधिकारी व स्वयंसेवी /अशासकीय संस्थांची निवड करण्यासंदर्भात निवड समिती स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक : संअनि-२००७/ प्र.क्र. २२६/ का-२
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ८ जून , २०१०.

**प्रस्तावना :-** केंद्र शासनाचा कौंटुंबिक हिंसाचारापासून महिलांचे संरक्षण अधिनियम, २००५ व कौटुंबिक हिंसाचारापासून महिलांचे संरक्षण नियम, २००६ हा जम्मू काश्मिर राज्य वगळता संपूर्ण देशात दि.२६.१०.२००६ रोजी अंमलात आलेला आहे. या कायद्याचा मुख्य उद्देश हा (अ) स्त्रियांना घरगुती छळापासून संरक्षण देणे. (ब) महिलांना घरात सुरक्षितता मिळावी व त्यांना बेघर केले जाऊ नये, महिलेचा घरात राहण्याचा हक्क अबाधीत राहावा. (क) महिलांचे महत्व कायम स्वरुपी तहहयात निरंतर राहण्यासाठी कठोर कायदेशीर उपाययोजना करणे. (ड) महिलांच्या अधिकाराची कडक अंमलबजावणी होणे असा आहे. तसेच हुंडा प्रतिबंधक अधिनियम, १९६१ खाली हुंडा प्रतिबंधक अधिकारी नेमण्याची तरतूद आहे. बाल विवाह प्रतिबंधक अधिनियम २००६ खाली बाल विवाह प्रतिबंधक अधिकारी नेमण्याची तरतूद आहे. महाराष्ट्र देवदासी प्रथा (नाहिशी करणे) अधिनियम, २००५ खाली देवदासी प्रतिबंधक अधिकारी नेमण्याची तरतूद आहे. या सर्व अधिनियमांची अंमलबजावणी करण्यासाठी स्वतंत्र अधिकाऱ्यांची नियुक्ती न करता कौटुंबिक हिंसाचारापासून महिलांचे संरक्षण अधिनियम, २००५ अंतर्गत संरक्षण अधिकाऱ्याची नियुक्ती करुन त्यांचेवरच वरील कायद्यांच्या अंमलबजावणीची जबाबदारी सोपविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

यासंदर्भात मंत्रीमंडळाच्या दि.२६.५.२०१० रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार स्वयंसेवी /अशासकीय संस्थांची निवड करण्याकरिता व संरक्षण अधिकाऱ्यांची नियुक्ती प्रक्रिया निश्चित करण्याकरिता एक समिती स्थापन करण्याचे शासनाच्या विधाराधीन होते.

**शासन निर्णय :-** वरील प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे संरक्षण अधिकाऱ्यांची कामे स्वयंसेवी /अशासकीय संस्थांमार्फत (out source) करुन घेण्याकरिता स्वयंसेवी / अशासकीय संस्थांच्या निवडीबाबतची आणि निवड केलेल्या अशासकीय संस्थामार्फत संरक्षण अधिकाऱ्याची नियुक्ती करण्याकरिता, अटी व शर्ती याबाबतचे निकष ठरविण्याकरिता त्याचप्रमाणे संरक्षण अधिकाऱ्यांचे मानधन व इतर अनुषंगिक खर्च निश्चिती करण्याकरिता मा.सचिव (म.व बा.वि.वि.) यांच्या अध्यक्षतेखाली पुढील प्रमाणे निवड समिती स्थापन करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | : अध्यक्ष |
| आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे | : सदस्य |
| उप सचिव, महिला व बाल विकास िवभाग, मंत्रालय, मुंबई | : सदस्य |
| विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई याचे प्रतिनिधी | : सदस्य |
| गृह विभाग मंत्रालय, मुंबई यांचे प्रतिनिधी | : सदस्य |
| महाराष्ट्र राज्य महिला आयोगाचे प्रतिनिधी | : सदस्य |
| उप आयुक्त (म. वि.), महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे | : सदस्य सचिव |
| टाटा सामाजिक विज्ञान संस्था, मुंबई यांचे प्रतिनिधी | : सदस्य |
| कर्वे इन्स्टिटयूट पुणे यांचे प्रतिनिधी | : सदस्य |
| निर्मला निकेतन कॉलेज ऑफ सोशल वर्क, मुंबई यांचे प्रतिनिधी | : सदस्य |

२. तसेच सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईट वर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१००६०९१७२३४३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सही/-
(श. पा. वारे)
शासनाचे उप सचिव,

प्रति,
मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

मा.मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग, मुंबई.
सह सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
सहसचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, महिला व  बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
संचालक, कर्वे इन्स्टिटयूट, पुणे.
प्राचार्य, निर्मला निकेतन कॉलेज ऑफ सोशल वर्क, मुंबई .
समन्वयक, महिला व बालकांचे विशेष कक्ष, टाटा सामाजिक विज्ञान संस्था, देवनार, मुंबई.८८
राज्य समन्वयक (पीपीएमयू), महिला व  बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती, का-२.